**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील गट-अ (क) (तां) संवर्गातील १ पद व गट-ब (तां) संवर्गातील २ पदे अशी एकूण ३ अधिसंख्य पदे निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : व्यशिअ-२०१९/प्र.क्र.२३७/व्यशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ ऑक्टोबर, २०२०

**संदर्भ :** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.: बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१.१२.२०१९
२) शासन समक्रमांकित आदेश दि.२४/०२/२०२०.

**प्रस्तावना –**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन दिनांक २१.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या अथवा अन्य जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करणे, तसेच उक्त अनुसूचित जमातीच्या पदावर नियुक्त झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची रिक्त होणारी पदे भरण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणीपत्र पाठविणे याबाबत सूचना दिलेल्या आहेत. त्यानुसार कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील गट-अ (क) (तां) संवर्गातील १ पद व गट-ब (तां) संवर्गातील २ पदे अशी एकूण ३ अधिसंख्य पदे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय –**

अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात वैधता प्रमाणपत्र सादर करु न शकलेल्या, अन्य मागासवर्ग जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेल्या, जातवैधता प्रमाणपत्राबाबत न्यायालयीन प्रकरणे प्रलंबित असलेल्या तसेच जात वैधता प्रमाणपत्र अवैध ठरल्याने सेवा समाप्त केलेल्या अधिकारी/कर्मचारी यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यंत्रणेतील खालीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या कार्यालयांमध्ये या शासन निर्णयान्वये गट-अ (क) (तां) संवर्गातील १ पद व गट-ब (तां) संवर्गातील २ पदे अशी एकूण ३ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | कार्यालय |
|---|---|---|
| १. | श्री. एस. आर. डोंगे, गट-अ (क) (तां) (सरळसेवा) | उपप्राचार्य,औद्योगिक प्रशिक्षण संस्था, चंद्रपूर, जि.चंद्रपूर. |
| २. | श्री. एस. पी. रंभाड, प्राचार्य, गट-ब (तां) (पदोन्नती) | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, लाखणी,जि.भंडारा. |
| ३. | श्री. संजय धोंडेबाजी बेंडे, प्राचार्य, गट-ब (तां) (पदोन्नती) | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, ब्रम्हपुरी, जि.चंद्रपूर. |

२. उपरोक्त अधिसंख्य पदावर सेवा वर्ग करण्यात येणारे अधिकारी त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या कार्यालयात सध्या ज्या पदावर कार्यरत आहेत त्या पदाचे अधिसंख्य पद निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असून, दिनांक ३१.१२.२०१९ पासून तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांकरीता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यत सदर अधिकारी यांच्याकरीता सदर अधिसंख्य पद अस्तित्त्वात राहील.

३. अधिसंख्य पदांच्या वेतनावर होणारा खर्च हा संबंधित कार्यालयाच्या वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक:बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९ च्या व शासन निर्णय क्र.बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दि.३०.६.२०२० च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय संदर्भाधीन क्रमांक २ येथील दि.२४.०२.२०२० रोजीच्या तीन आदेशांना पूर्वलक्षी प्रभावाने लागू राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०२७१५१०३२७७०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Baban Sheshrao Mandwe

Digitally signed by Baban Sheshrao Mandwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=d101a905c7fca95ea9a4a68053d53dda9fcd8b54a203c383517611e96421b187,
serialNumber=1aa5b45b907b3656679abdeb9469faf1da391d1546ceaae47f19acd496b13685, cn=Baban Sheshrao Mandwe
Date: 2020.10.27 15:12:08 +05'30'

**( ब. शो. मांडवे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
२) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा., मुंबई.
४) सर्व सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय
५) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी,
६) सर्व संबधित संस्था
७) सामान्य प्रशासन विभाग ( कार्यासन १६-ब)
८) सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग
९) निवड नस्ती (व्यशि-१).